एके काळी तीन भयंकर लुटारू होते. ते लांब काळे अंगरखे आणि लांब काळ्या टोप्या घालत असत.एकाजवळ पिस्तुल, दुसऱ्याजवळ लाल मिरचीची फुंकणी आणि तिसऱ्याच्या जवळ दोन तोंडाची लाल कुऱ्हाड होती. याच्या साहय्याने ते वाटसरूना आणि प्रवाशांना घाबरवत असत आणि लुटत असत.

मग एका रात्री त्यांची गाठ टिफ़नी नावाच्या एका अनाथ मुलीशी पडली. “हे सगळं तुम्ही कशासाठी करत आहात?” मुलीने त्यांची विशाल संपत्ती बघितल्यानंतर विचारले. त्यानंतर लुटारूनी खूप विचार केला आणि त्यांचे मन बदलले आणि त्यांनी एक नवीन काम सुरु केले.



एके काळची गोष्ट आहे, तीन भयंकर लुटारु होते. ते लपण्यासाठी काळे अंगरखे आणि लांब काळ्या टोप्या घालत.





एकाजवळ पिस्तुल, दुसऱ्याजवळ लाल मिरचीची फुंकणी आणि तिसऱ्याच्या जवळ दोन तोंडाची लाल कुऱ्हाड होती.









ते रात्रीच्या अंधारात वाटसरू आणि
प्रवासी शोधत सत्यावर फिरत असत..

ते सगळ्यांना घाबरवत, धमक्या देत. त्यांना बघून महिला बेशुद्ध पडत. शूर पुरुष आपला जीव वाचवण्यासाठी पळत. त्यांना बघून कुत्री गायब होत.



गाड्यांना थांबवण्यासाठी लुटारू
घोड्यांच्या डोळ्यात लाल मिरचीची
पावडर फुंकत.





ते आपल्या धारदार कुऱ्हाडीने गाड्यांना पहिले तोडत असत.



लुटारुंचे ठिकाण उंच पहाडावर एका गुंफेत होते. तिथे ते आपली लुट लपवून ठेवत.





ते आपल्या बंदुकीने प्रवाशांना धमकावत आणि मग त्यांना लुटत असत.



त्यांच्या जवळ पेट्या भर भरून सोने, दागिने, पैसे, घड्याळे, अंगठ्या आणि किंमती खडे होते.



एका सुनसान काळ्या रात्री लुटारूंनी एक गाडी रोखली ज्यात फक्त एक प्रवासी होता - टिफ़नी नावाची एक अनाथ छोटी मुलगी. ती आपल्या दुष्ट काकू बरोबर राहयला चालली होती. लुटारूंना भेटून टिफ़नी खूप खुश झाली.



तसेतर टिफ़नी जवळ काहीच खजिना नव्हता. म्हणून चोरांनी तिला एका गरम शालीत गुंडाळले आणि तिला आपल्या बरोबर घेवून गेले.



त्यांनी आपल्या गुहेत एका कोपऱ्यात तिच्यासाठी एक मऊ अंथरूण टाकले.



दुसऱ्या दिवशी सकाळी ती उठली तर तिच्याभोवती संपत्तीने भरलेल्या चमचमणाऱ्या पेट्या तिने पाहिल्या.

“हे सगळं कशासाठी आहे?” टिफ़नीने विचारले.

लुटारु तिच्या प्रश्नाने गोंधळले आणि त्यांना योग्य उत्तर सुचले नाही. त्यांनी हा विचार कधीच केला नव्हता की, ते आपली संपत्ती कशी खर्च करणार आहेत.



म्हणून आपल्या धन दौलतीचा सदुपयोग करण्यासाठी त्यांनी सगळ्या अनाथ, गरीब, दुःखी आणि रस्त्यावर भटकणाऱ्या मुलांना त्यांनी गोळा केले.







मग त्यांनी त्या सगळ्या मुलांना
राहण्यासाठी एक सुंदर महाल
खरेदी केला.

सगळी मुलं लाल कोट आणि लाल टोपी घालून, आपल्या नव्या घरात राहायला गेले.



त्या महालाची कहाणी पूर्ण देशात पसरली. मग त्या तीन लुटारुंच्या दरवाज्यात लोक रोज नव-नवीन मुलं घेवून येत.



मुलं महालात तोपर्यंत राहिले,जोपर्यंत ते लग्न करण्याच्या वयाचे होत नाही.
मग मुलांनी महालाच्या चारी बाजूला आपापले घर बांधले. हळूहळू तिथं एक गाव वसलं. जिथं लोक लाल कपडे आणि लाल टोप्या घालत. मग त्या मुलांनी आपल्याला वडिलांसारखी मदत करणाऱ्या तीन लुटारुंच्या आठवण म्हणून तीन उंच मनोरे बांधले. तीन लुटारू साठी एक-एक.



समाप्त